आदिवासी उपयोजनेच्या अंमलबजावणी मध्ये बदल करण्यासाठी स्थापन केलेल्या पुनर्विलोकन समितीस मुदतवाढ देण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः टिएसपी २०१३/प्र.क्र.२६४/कार्यासन-६

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०३ सप्टेंबर,२०१५

वाचा -

१) शा.नि, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी २०१३/प्र.क्र.२६४/का.६, दि.२८.४.२०१४.
२) शा.नि, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी २०१३/प्र.क्र.२६४/का.६, दि.२६.६.२०१४.
३) शासन ज्ञापन क्र. टिएसपी २०१३/प्र.क्र.२६४/का.६, दि.२६.६.२०१४, दि.२१.८.२०१४.
४) शा.नि, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी २०१३/प्र.क्र.२६४/का.६, दि.२१.८.२०१४
५) शासन शुध्दिपत्रक क्र. टिएसपी २०१३/प्र.क्र.२६४/का.६, दि.२६.६.२०१४, दि.२७.८.२०१४

शासन निर्णय -

विभागाच्या वर नमूद केलेल्या दिनांक २८.४.२०१४ च्या शासन निर्णयाद्वारे स्थापन केलेल्या आदिवासी उपयोजना पुनर्विलोकन समितीची मुदत दिनांक २७.१०.२०१४ रोजी संपुष्टात आली असल्यामुळे सदर समितीस दिनांक २८.१०.२०१४ ते दिनांक ३०.११.२०१५ पर्यंत पुढील १३ महिन्याच्या कालावधीकरिता या शासन निर्णयाद्वारे मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर समितीने करावयाची कामे, तिची कार्यकक्षा, तिच्या जबाबदा-या व कर्तव्ये त्याचप्रमाणे अटी व शर्ती या संदर्भातील दिनांक २८.०४.२०१४ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणेच राहतील.

सदर समितीसाठी होणारा खर्च मागणी क्र.टि-५, २२२५-अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती व इतर मगासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -०२, अनुसूचित जमातीचे कल्याण -७९६, आदिवासी क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना (०१) (०१) आदिवासी विकास आयुक्तालय ( २२२५-१३९३ ) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व सदर खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२४५/व्यय-१४, दिनांक २७.८.२०१५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०३१४०२३५८९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2015.09.03 14:45:35 +05'30'

**( भगवान सावंत )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
३. मा.सचिव (आदिवासी विकास) यांचे स्वीय सहायक
४. श्री.पी.डी.करंदीकर, अध्यक्ष,
५. श्री.कृष्णा वत्स, सदस्य,
६. श्री.आर.के.मुटाटकर, सदस्य,
७. श्री. प्रदिप प्रभु, सदस्य
८. प्रो.जानकी अंधारिया, सदस्य
९. डॉ.विनायक तुमराम, सदस्य
१०. श्री.मधुसूदन साठे, सदस्य
११. श्री.रत्नाकर महाजन, सदस्य
१२. महालेखापाल १-२, (लेखापरिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
१४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
१५. सर्व जिल्हाधिकारी,
१६. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास
१७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
१९. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. निवडनस्ती (कार्यासन-६)